विधानसभा सार्वत्रिक निवडणुका-२०१९ च्या कामासाठी नियुक्त केलेल्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना पारिश्रमिक / मानधन देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: निभत्ता-०२२०/१७०४/प्र.क्र.२९/विशा-१ अ**
मंत्रालय (मुख्य इमारत), दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २१ सप्टेंबर, २०२१.

वाचा :- (१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची पत्रे क्र.पोमसं/२१/७२७२/ विधानसभा निवडणुक/२२८/२०१९, दि.२८.११.२०१९, व दि.१४.०५.२०२१.
(२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.४५३४/पोउआ/अभियान/वि.स.नि.कक्ष/२०२०, दि.०२.०६.२०२० व दि.०९.०६.२०२१.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यातील सार्वत्रिक विधानसभा निवडणूक ऑक्टोंबर, २०१९ मध्ये शांततेत पार पडली आहे. विधानसभा सार्वत्रिक निवडणुकीची अधिसूचना जारी झाल्यापासून ते निवडणुकीची प्रक्रिया पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीमध्ये, पूर्ण वेळ प्रत्यक्ष निवडणुकीच्या कामासाठी नियुक्त केलेल्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना निवडणुकीची संवेदनशील, जिकिरीचे आणि दगदगीचे काम अत्यंत परिश्रमपूर्वक व जबाबदारीने पार पाडवे लागले. यास्तव, विधानसभा निवडणुका-२०१९ साठी पूर्ण वेळ प्रत्यक्ष निवडणुकीच्या कामासाठी नियुक्त केलेल्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना पारिश्रमिक / मानधन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्यातील विधानसभा सार्वत्रिक निवडणुका-२०१९ ची अधिसूचना जारी झाल्यापासून ते निवडणुकीची प्रक्रिया पूर्ण होईपर्यतच्या कालावधीमध्ये पूर्ण वेळ प्रत्यक्ष निवडणुकीच्या कामासाठी नियुक्त केलेल्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्यावर पडलेला निवडणुकीच्या कामाचा ताण, कामाची व्याप्ती व कामाचे दिवस इत्यादी बाबी विचारात घेवून सोबत जोडलेल्या **परिशिष्ट "अ" व परिशिष्ट "ब"** मधील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना, त्यांच्या माहे ऑक्टोंबर, २०१९ या महिन्यातील ७ व्या वेतन आयोगानुसार अनुज्ञेय मूळ वेतनाएवढे (Basic Pay) पारिश्रमिक/ मानधन म्हणून एकूण रु.२६,६१,४१,६८६/- (सव्वीस कोटी एकसष्ठ लक्ष एक्केचाळीस हजार सहाशे शहाऐंशी फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे. परंतु, ज्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांनी एक महिन्यापेक्षा म्हणजे ३० दिवसापेक्षा कमी दिवस निवडणुकीचे काम केले असेल त्यांना, जेवढे दिवस त्यांनी काम केले असेल तेवढ्या दिवसाचे पारिश्रमिक/ मानधन देय होईल. ज्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांनी एक महिन्यापेक्षा म्हणजे ३० दिवसापेक्षा जास्त दिवस निवडणुकीचे काम केले असेल त्यांना कमाल एक महिन्याचे वेतन (मूळ वेतन ) देय होईल. अशी रक्कम कोणत्याही पोलीस अधिका-यांस / कर्मचा-यांस त्यांच्या १ महिन्याच्या वेतनापेक्षा (मूळ वेतन ) जास्त असणार नाही, तसेच विधानसभा सार्वत्रिक निवडणुका-२०१९ साठी सदर मानधन हे एका अधिका-यांस / कर्मचा-यांस एकदाच देय होईल.

२. पोलीस महासंचालक यांच्या अखत्यारीतील घटक कार्यालयातील सोबत जोडलेल्या **"परिशिष्ट-अ"** मधील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांचे पारिश्रमिक/ मानधन यावर होणारा खर्च, "***(१)*** मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस, (००) १०९ जिल्हा पोलीस, (००)(०१) जिल्हा पोलीस बल, दत्तमत (२०५५ ०१६८), (०१) वेतन, ***(२)*** मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस, १११ रेल्वे पोलीस (००)(०३) रेल्वे पोलीस (२०५५ ०४४४), (०१) वेतन, ***(३)*** मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस, १०१ अॅन्टी करप्शन ब्युरो (२०५५ ००५२), (०१) वेतन, ***(४)*** (००)(०४) गुप्तवार्ता विभाग (२०५५ ०४३५), (०१) वेतन, ***(५)*** ००१ संचालन प्रशासन (००)(०१) पोलीस निरीक्षणालय (२०५५ ००१४) (०१) वेतन," या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षातील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अखत्यारीतील घटक कार्यालयातील सोबत जोडलेल्या **"परिशिष्ट-ब"** मधील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांचे पारिश्रमिक/मानधन यावर होणारा खर्च, मागणी क्र. "बी-१, २०५५ पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस - आस्थापना, दत्तमत (२०५५ ००९७) (०१) वेतन" या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षातील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अखत्यारीतील घटक कार्यालयातील सोबत जोडलेल्या **"परिशिष्ट-अ"** मध्ये नमूद केलेल्या **पोलीस उप महानिरिक्षक, अपर पोलीस अधिक्षक, कार्यालय अधिक्षक, प्रमुख लिपिक, वरिष्ठ लिपिक, कनिष्ठ लिपिक** तसेच पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अखत्यारीतील घटक कार्यालयातील सोबत जोडलेल्या **"परिशिष्ट-ब"** मध्ये नमूद केलेल्या **प्रशासकिय अधिकारी, प्रमुख लिपिक, वरिष्ठ लिपिक, कनिष्ठ लिपिक** या पदांवर कार्यरत असलेले कर्मचारी, हे पोलीस संवर्गातील आहेत किंवा कसे याबाबतची खातरजमा केल्याशिवाय त्यांना परिश्रमिक/ मानधन देण्यात येवू नये. तसेच संबंधित कर्मचा-यांनी निवडणूक कर्तव्यावर काम केले आहे याची प्रथम खातरजमा करण्यात यावी.

५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अखत्यारीतील घटक कार्यालयातील सर्व पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना पारिश्रमिक / मानधन हे सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षात अदा होईल याची दक्षता घ्यावी.

६. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाशी विचारविनिमय करुन तसेच वित्त विभाग, अनौ. संदर्भ क्र.५३३/२०२१/व्यय-७, दिनांक १०.०८.२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९२११५०४३११८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dagadu Khedekar

Digitally signed by Sanjay Dagadu Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a53701d2758331055dd3c46d615f8367912b1c64cd218e709c1b4de20bdf4f85, cn=Sanjay Dagadu Khedekar
Date: 2021.09.21 15:07:13 +05'30'

**( संजय खेडेकर )**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

४. महाराष्ट्रातील सर्व मा. संसद सदस्य.
५. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा / विधान परिषद.
६. सर्व मा. विधानसभा सदस्य / मा. विधान परिषद सदस्य.
७. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
११. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१४. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांचे स्वीय सहायक.
१५. सर्व पोलीस आयुक्त.
१६. सर्व पोलीस अधीक्षक.
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / बांद्रा.
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२०. वित्त विभाग, व्यय-४ / व्यय-७, मंत्रालय, मुंबई.
२१. सामान्य प्रशासन विभाग, का. क्र. ३३, मंत्रालय, मुंबई.
२२. निवडनस्ती (कार्यासन विशा-१अ).

## परिशिष्ट -अ

## पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अखत्यारील घटक कार्यालयातील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्या पारिश्रमिक/ मानधनाचे विवरणपत्र.

| अ.क्र. | पदनाम | एकूण अधिकारी / कर्मचारी | एकूण मुळ वेतनाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १. | पोलीस महासंचालक | ०१ | २,२५,०००/- |
| २. | अपर पोलीस महासंचालक | १० | २१,४४,६००/- |
| ३. | विशेष पोलिस महानिरीक्षक | १५ | २५,१३,६००/- |
| ४. | पोलीस उप महानिरीक्षक | १३ | १६,८८,०५०/- |
| ५. | पोलीस उप आयुक्त / पोलीस अधिक्षक | ७२ | ६१,८७,९००/- |
| ६. | अपर पोलीस अधिक्षक | ३९ | २८,९३,२००/- |
| ७. | सहायक पोलीस अधिक्षक (Prob.) | ०२ | १,१५,६००/- |
| ८. | सहायक पोलीस आयुक्त / पोलिस उप अधिक्षक | २८४ | २,०९,८९,५८६/- |
| ९. | पोलीस निरीक्षक | ७०९ | ५,०५,३५,६८१/- |
| १०. | सहायक पोलीस निरीक्षक | ४१७ | २,१४,६५,५१५/- |
| ११. | पोलीस उप निरीक्षक | २११ | ९६,३०,३९०/- |
| १२. | पोलीस महासंचालक यांचे उप सहायक | ०१ | ६९,७००/- |
| १३. | कार्यालय अधिक्षक | ०३ | १,७६,२००/- |
| १४. | सहायक पोलिस उपनिरीक्षक | १५५ | ७२,६७,७००/- |
| १५. | पोलीस हवालदार | ६५८ | २,७१,६४,६४०/- |
| १६. | पोलीस नाईक | ८७० | ३,०६,४८,४२०/- |
| १७. | पोलीस शिपाई | १०२७ | २,९८,१६,८२४/- |
| १८. | प्रमुख लिपिक | ०२ | ९२,४००/- |
| १९. | वरिष्ठ लिपिक | ०५ | १,५९,१००/- |
| २०. | कनिष्ठ लिपिक | ०३ | ६५,१००/- |
| | **एकुण** | **४४९७** | **२१,३८,४९,२०६/-** |

## परिशिष्ट -ब

**पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अखत्यारील घटक कार्यालयातील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्या पारिश्रमिक/मानधनाचे विवरणपत्र.**

| अ.क्र. | पदनाम | एकूण अधिकारी / कर्मचारी | एकूण मुळ वेतनाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १. | पोलीस आयुक्त | ०१ | २,२४,४००/- |
| २. | सह पोलीस आयुक्त | ०१ | १,८८,२००/- |
| ३. | अपर पोलीस आयुक्त | ०१ | १,३१,१००/- |
| ४. | पोलीस उप आयुक्त | ०८ | ६,५७,६००/- |
| ५. | सहाय्यक पोलीस आयुक्त | १० | ९,००,६००/- |
| ६. | पोलीस निरीक्षक | ११४ | ७८,५९,५१०/- |
| ७. | सहायक पोलीस निरीक्षक | ८२ | ४१,६५,९००/- |
| ८. | पोलीस उप निरीक्षक | १२० | ५५,१४,५८०/- |
| ९. | सहायक पोलीस उप निरीक्षक | ४४ | २१,१६,८००/- |
| १०. | पोलीस हवालदार | १७९ | ७७,४८,२१०/- |
| ११. | पोलीस नाईक | २२२ | ८४,५६,१८०/- |
| १२. | पोलीस शिपाई | ४७४ | १,४२,०६,०००/- |
| १३. | प्रशासकिय अधिकारी | ०१ | ५९,६००/- |
| १४. | वरिष्ठ लिपिक | ०१ | ३८,६००/- |
| १५. | कनिष्ठ लिपिक | ०१ | २५,२००/- |
| | **एकुण** | **१२५९** | **५,२२,९२,४८०/-** |